महिला व बाल विकास विभागांतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या -सन २०२०

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक: मबाआ-२०१९/प्र.क्र.७२/कार्या-७अ**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक - १७ जानेवारी, २०२०**

वाचा :- शासन निर्णय क्र. मबाआ-२०१५/प्र.क्र.२२/का-७ अ, दिनांक ५/५/२०१५.

**-: शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास समक्ष असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने या विभागातील खालील अधिका-यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ येथे दर्शविलेल्या ठिकाणी व सार्वजनिक सेवेच्या हितार्थ प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिका -याचे नाव | सध्याचे पद व कार्यालय | पदस्थापनेनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.एन.के. अहिरराव | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), अक्राणी (धडगाव), जि.नंदुरबार | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), पाथरी, जि.परभणी |
| २ | श्री.आर.एस. मराठे | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), खुंटामोडी, ता.धडगाव जि.नंदुरबार | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), देऊळगाव राजा, जि.बुलडाणा |

२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना कळविण्यात येते की, वरीलप्रमाणे पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांचे अधिनस्त पदस्थापनेचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत. बदली झालेल्या अधिका-यांना कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व सदरील अधिका-यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर तात्काळ रूजु व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रूजु होणा-या पदावरच काढण्यात येतील याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

३. संबंधित अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक -सीडीआर-१०८२/ २५६७/ २८/ अकरा, दिनांक ३०/८/१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी बदली झालेल्या अधिका-यांना त्यांच्या सद्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे. जे कार्यालय प्रमुख बदली झालेल्या अधिका-यांना विहित मुदतीत कार्यमुक्त करणार नाहीत अशा अधिका-यांच्या विरुध्द शिस्तभंग कार्यवाहीचा प्रस्ताव आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी शासनास सादर करावा.

५. संबंधित अधिका-यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. जे अधिकारी नियुक्ती नंतर विहित कालावधीत बदली झालेल्या पदावर रुजू होणार नाहीत अशा अधिकाऱ्यांविरुध्द आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

६. वरिलप्रमाणे बदली करण्यात येत असलेल्या अधिका-यांची पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

७. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिका-यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

८. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिका-यांनी बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित अधिकाऱ्यांवर राजकीय दबावाबाबतची ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणुक) नियम १९७९ मधील क्रमांक २३ व क्रमांक (३) (३) चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिका-यांना पदस्थापनाने देण्यात येणा-या पदावर जू करुन घेताना, ते रजेवर/गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच

रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०२००११७१०५७३७४५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.01.20 12:35:35 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
**शासना चे सह सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
२. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
३. मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
४. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. सचिव (म.व बा.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई-३२.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद , नंदुरबार/परभणी/बुलडाणा (आयुक्तालय, पुणे मार्फत)
७. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास, नाशिक/औरंगाबाद/अमरावती (आयुक्तालय, पुणे मार्फत)
८. जिल्हा कार्यक्रम अधिकारी, (म.व बा.वि.), जि. प., नाशिक/औरंगाबाद/अमरावती (आयुक्तालय, पुणे मार्फत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार/परभणी/बुलडाणा (आयुक्तालय, पुणे मार्फत)
१०. महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११. संबंधित अधिकारी , द्वारा- आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१२. निवडनस्ती (कार्यासन-७अ), महिला व बाल विकास विभाग.